कुलसचिव, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करणेबाबत.

<u>श्री.संतोष सिताराम वेणीकर, उप जिल्हाधिकारी.</u>

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन आदेश क्र.मकृवि- १२२४/प्र.क्र.७७/६-अे**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक :- ०८ ऑगस्ट, २०२४.

संदर्भ:- १.महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. टिआरएफ- ०७२४/प्र.क्र.१९१/ई-२, दि.३१.०७. २०२४.
२.सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र.एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.५१०/कार्या.१२, दि.१६.०२.२०१८

## शासन आदेश

श्री.संतोष सिताराम वेणीकर, उप जिल्हाधिकारी, भूसंपादन (लाभक्षेत्र), यवतमाळ) यांचे कुलसचिव, वसंतराव नाईक मराठवाडा कृषी विद्यापीठ, परभणी या पदावर ३ वर्षांच्या कालावधीसाठी, महाराष्ट्र बदली अधिनियम, २००५ मधील कलम ४(४), ४(५) व महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वियेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी, सेवेतून काढून टाकणे) नियम, १९८१ च्या नियम ४० मधील परिशिष्ट-२ मधील विहित अटी व शर्तींना अनुसरुन, महसूल व वन विभागाने दि. ३१ जुलै, २०२४ च्या आदेशान्वये प्रतिनियुक्तीने नियुक्ती आदेश निर्गमित केले आहेत.

२. तसेच, श्री.संतोष सिताराम वेणीकर, उप जिल्हाधिकारी यांना पुढील सूचनांसाठी अपर मुख्य सचिव (कृषि) यांच्याकडे हजर व्हावे, असे आदेशात नमूद केले आहे. त्यास अनुसरुन श्री.संतोष सिताराम वेणीकर, उप जिल्हाधिकारी यांना कुलसचिव, वसंतराव नाईक मराठवाडा कृषी विद्यापीठ, परभणी या पदावर तीन वर्षांच्या कालावधीकरिता खालील नमूद अटी व शर्तींच्या अधीन राहून प्रतिनियुक्तीने रूजू करून घेण्यात येत आहे:-

अ) श्री.संतोष सिताराम वेणीकर, उप जिल्हाधिकारी यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी हा या आदेशाच्या दिनांकापासून सुरू होईल, त्यानुसार त्यांनी तात्काळ प्रतिनियुक्तीच्या पदावर रूजू व्हावे.

ब) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन/सक्षम प्राधिकाऱ्यास राहील.

क) जर त्यांची सेवा स्वीयेतर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर त्यांना मूळ विभागाकडे परत पाठविण्याची मुभा, स्वीयेतर नियोक्त्याला राहील. मात्र, याप्रमाणे परत पाठविण्यापूर्वी स्वीयेतर नियोक्त्याने शासनाला / सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे.

ड) श्री.संतोष सिताराम वेणीकर, उप जिल्हाधिकारी यांनी मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे अशी कमीत कमी तीन महिन्यांची लेखी नोटीस शासनाला/सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.

इ) कुलसचिव, वसंतराव नाईक मराठवाडा कृषी विद्यापीठ, परभणी या पदाची वेतनश्रेणी अवनत करून श्री.संतोष सिताराम वेणीकर, उप जिल्हाधिकारी यांना प्रतिनियुक्तीने नियुक्ती देण्यात येत आहे. श्री.वेणीकर त्यांच्या उप जिल्हाधिकारी या मूळ पदाच्या वेतनश्रेणीनुसार वेतन आहरित करतील.

३. श्री.संतोष सिताराम वेणीकर, उप जिल्हाधिकारी यांना सामान्य प्रशासन विभागाने वेळोवेळी लागू केलेल्या प्रतिनियुक्तीच्या अटी, शर्ती व नियम लागू राहतील.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०८०८१९०३४१६४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRATIBHA MADHAV PATIL

Digitally signed by PRATIBHA MADHAV PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=b693d975fffc642fe6b87c2ce9e1297fd1e8bda9b459f85f75f159984ba680fd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DA026E85AE8CBB4E3C2ACDBECBBF2F6D6CB0AE6ED5C1E54483490119EE0456AD, cn=PRATIBHA MADHAV PATIL
Date: 2024.08.08 19:19:00 +05'30'

**( प्रतिभा पाटील )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्री.संतोष सिताराम वेणीकर, उप जिल्हाधिकारी, भूसंपादन (लाभक्षेत्र), यवतमाळ)
(प्रशासकीय विभागामार्फत.)

**प्रत:-**

१) मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२) अपर मुख्य सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
३) अपर मुख्य सचिव, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
४) महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे.
५) कुलगुरू, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ,परभणी.
६) निवडनस्ती-६ अे.